**<u>राज्य योजना सन २०१५-१६</u>**

**निसर्ग पर्यटन (२४०६-२२९५) व वन्यपशु संरक्षित क्षेत्रामध्ये प्राण्यांच्या संरक्षणा संबंधीत आवश्यक ती बांधकामे करणे (२४०६-२२२१).**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः डब्ल्यूएलपी-०८१५/प्र.क्र.२६२/फ-१**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक :- १३ ऑगस्ट, २०१५

**<u>वाचा :-</u>**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-२२ (६)/योजना/प्र.क्र.२४/१८७१/(१५-१६), दिनांक :- ०७.०८.२०१५.

२. वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दिनांक १७.०४.२०१५.

३. वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक:- अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दिनांक १७.०४.२०१५

**<u>प्रस्तावना :-</u>**

सन २०१५-१६ राज्यस्तरीय योजनेतंर्गत निसर्ग पर्यटन योजना (२४०६ २२९५) या लेखाशिर्षांतर्गत रुपये ५१००.०० लक्ष इतका नियतव्यय मंजूर असून त्यापैकी रु. ३५७०.०० लक्ष नियतव्यय अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. सदर योजनेतील रु. २०००.०० लक्ष इतका नियतव्यय संरक्षित क्षेत्राकरिता मंजूर करण्यात आला असून त्यापैकी रु. १४००.०० लक्ष निधी व वन्यपशु संरक्षित क्षेत्रामध्ये प्राण्यांच्या संरक्षणासंबंधीत आवश्यक ती बांधकाम करणे (२४०६-२२२१) या लेखाशिर्षांतर्गत रुपये ९००.०० लक्ष इतका नियतव्यय मंजूर असून त्यापैकी रु. ६३०.०० लक्ष नियतव्यय अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे.

२. सन २०१५-१६ मध्ये अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या नियतव्ययानुसार हाती घ्यावयाच्या कार्यबाबींमधून ज्या कार्यबाबींना तांत्रिक मान्यता घेणे अनिवार्य आहे अशा कार्यबाबींचे तांत्रीक व प्रशासकीय मान्यता क्रमांक नमूद करुनच प्रस्ताव सादर करण्याच्या सूचना देण्यात आल्या आहेत. तथापि तांत्रीक मान्यतेसाठी बहुतांशी संरक्षित क्षेत्रामध्ये आवश्यक त्या तंत्रज्ञांची वानवा असल्यामुळे (व्याघ्र प्रकल्प वगळून) अशा कार्यबाबींना तांत्रीक मान्यता दुरापास्त ठरत असल्यामुळे अशा कार्यबाबींसाठी तांत्रिक मान्यतेसाठी शासनाचे इतर विभागा जसे सार्वजनिक बांधकाम, जलसंधारण, सार्वजनिक पाणी पुरवठा विभाग अंदाजपत्रकाच्या ३% निधीची मागणी करीत असतात त्यांचे पूर्ततेसाठी अशी रक्कम आगाऊ संबंधीत यंत्रणेकडे जमा करणे आवश्यक आहे.

३. राज्या योजना २४०६-२२९५ निसर्ग पर्यटन व २४०६-२२२१ वन्यपशु संरक्षित क्षेत्रामध्ये प्राण्यांच्या संरक्षणा संबंधीत आवश्यक ती बांधकामे करणे या लेखाशिर्षाखाली ढोबळ रककम अनुक्रमे रु. ६००.० लक्ष व रु. २००.०० लक्ष असे एकूण रु. ८००.०० लक्ष रक्कम असे आहे त्यानुसार

३% म्हणजे रु. २४.०० लक्ष असल्याचे प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी त्यांचे संदर्भीय पत्रामध्ये नमूद केले आहे.

४. वित्त विभागाच्या संदर्भीय परिपत्रक क्रमांक २ अन्वये सन २०१५-१६ करीता योजनेअंतर्गत निसर्ग पर्यटन (२४०६-२२९५) व वन्यपशु संरक्षित क्षेत्रामध्ये प्राण्यांच्या संरक्षणासंबंधीत आवश्यक ती बांधकाम करणे (२४०६-२२२१) मधील विहीत प्रयोजनाखाली अर्थसंकल्पित निधीच्या ७० % मर्यादेत निधी माहे नोव्हेंबर, २०१५ पर्यत खर्च करण्यास **" अर्थसंकल्पात समाविष्ट असलेल्या योजनांतर्गत जुन्या योजनांचा खर्च - योजनेच्या स्वरुपात अथवा व्याप्तीमध्ये बदल होत नसल्यास वित्त विभागाबरोबर नियोजन विभागाचीही सहमती आवश्यक नाही "** या अटीवर खर्च करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

**शासन निर्णय :-**

सदर शासन निर्णयान्वये निसर्ग पर्यटन (२४०६-२२९५) या लेखाशिर्षाखाली रु. १८.०० लक्ष व वन्यपशु संरक्षित क्षेत्रामध्ये प्राण्यांच्या संरक्षणासंबंधीत आवश्यक ती बांधकाम करणे (२४०६-२२२१) या लेखाशिर्षाखाली रु. ६.०० लक्ष असे एकूण रु. २४.०० लक्ष) निधी तांत्रिक मान्यतेसाठी शुल्कापोटी खर्च करण्यास खालील अटीवर शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. सदर योजनेवर खर्ची टाकावयाची रक्कम सन २०१५-१६ मध्ये लेखाशिर्ष क्रमांक .२४०६ वनीकरण व वन्यजीवन, पंचवार्षिक योजनांतर्गत, राज्य योजनांतर्गत योजना (०२) (०६) इको टुरिझम (राज्य) (२४०६-२२९५) ५० - इतर खर्च रु. १८.०० लक्ष व लेखाशिर्ष क्रमांक २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ०२ पर्यावरणीय वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीव राज्य योजनांतर्गत योजना (००) (११) वन्यपशु संरक्षित क्षेत्रामध्ये प्राण्यांच्या संरक्षणासंबंधीत आवश्यक ती बांधकाम करणे (२४०६-२२२१) ५० - इतर खर्च रु. ६.०० लक्ष उद्दिष्टनिहाय, अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे प्राप्त होणाऱ्या निधीतून करण्यात यावा.
२. वितरीत केलेला निधी शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेस विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून, प्रचलित धोरण व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.
३. सदर निधीच्या योग्य विनियोगाबाबत प्रधान मुख्य वन सरंक्षक यांनी सनियंत्रण करावे.
४. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शक सूचनांचे व दिनांक १७.०४.२०१५ च्या परिपत्रकाचे काटेकोर पालन करावे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक:- अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दिनांक १७.०४.२०१५ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८१३१५०६१३४५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

APTE ARVIND SHANKAR

Digitally signed by APTE ARVIND SHANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT,CID - 918010, postalCode=400032, st=Maharashtra, cn=APTE ARVIND SHANKAR
Date: 2015.08.13 15:22:01 +05'30'

( अरविंद आपटे )
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम, मुंबई/ पूर्व, नागपूर/ नाशिक.
५. मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक सह्याद्री व्याघ्र प्रकल्प, कोल्हापूर.
६. मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती.
७. मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक पेंच व्याघ्र प्रकल्प, नागपूर.
८. मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर.
९. मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरिवली
१०. मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, (वन्यजीव) पुणे
११.वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, नवेगाव-नागझिरा व्याघ्र प्रकल्प, गोंदिया.
१२.महालेखापाल१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षण), मुंबई/नागपूर.
१३.ब-१, फ-२,फ-१ कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

********

**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी- ०८१५/प्र.क्र.२६२/फ-१, दिनांक :- १३ ऑगस्ट, २०१५ सोबतचे मासिक निधी विवरण पत्र.**

(रक्कम रु. लाखात)

| **अ.क्र.** | **लेखाशिर्ष** | उपशिर्ष | ऑगस्ट, २०१५ | सप्टेंबर, २०१५ | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| १ | **२४०६-२२९५** | ५०-इतर खर्च | ९.०० | ९.०० | १८.०० |
| २ | **२४०६-२२२१** | ५०-इतर खर्च | ३.०० | ३.०० | ६.०० |
| | | एकूण | १२.०० | १२.०० | २४.०० |

******